आदिम जमाती विकास योजना (CCD Plan)
सन २०१३-१४ मार्गदर्शक तत्वांना मंजुरी
देणेबाबत

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः पीटीजी-२०१४/प्र.क्र.२६/का-१९
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक -१९ मार्च, २०१५

वाचा:-

१) शासन निर्णय आदिवासी विकास विभाग, क्र.पीटीजी-२०१३/ प्र.क्र.१७१/ का.१९, दि.१६/११/२०१३
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, समक्रमांक दिनांक २४/०३/२०१४
३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, पीटीजी-२०१४/प्र.क्र.४१/का-१९, दि.१३/०८/२०१४.

प्रस्तावना -:

राज्य शासनाच्या संदर्भ क्र. १ च्या प्रस्तावास अनुसरुन केंद्र शासनाने आदिम जमाती विकास योजना (CCD Plan) या योजनेखाली सन २०१३-१४ या आर्थिक वर्षात एकूण रु.२६१०.०० लक्ष निधी वितरीत केला आहे. वितरीत निधीतून योजनांच्या मार्गदर्शक सूचनांना मंजूरी देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय-

या निर्णयाद्वारे सोबत जोडलेल्या परिशिष्टानुसार खालील योजनेच्या/कामाच्या अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक सूचनाना शासनाची मंजूरी देण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित योजना | मंजूर निधी (रु.लक्ष) |
|---|---|---|
| १ | आदिम जमातीच्या ८वी ते १० वी च्या मुलींना शैक्षणिक प्रवाहात टिकवून ठेवण्यासाठी आर्थिक सहाय्य करणे. | २००.०० |
| २. | अदिम जमातीच्या कुटुंबासाठी घरकुल योजना | ४००.०० |
| | एकूण | ६००.०० |

आयुक्त,आदिवासी विकास यांनी सदर मार्गदर्शक सूचनांनुसार वितरीत तरतुदींच्या मर्यादेत योजना राबविण्याबाबत त्वरीत कार्यवाही करण्यात यावी व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी. तसेच ज्याप्रकरणी प्रशासकीय मान्यता घेण्यांची आवश्यकता असेल ती प्रकरणे स्वतंत्रपणे शासन मान्यतेसाठी सादर करावीत.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२३१२३२५९३५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Manojkumar Gorakh Mahale

Digitally signed by Manojkumar Gorakh Mahale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Manojkumar Gorakh Mahale
Date: 2015.03.23 12:53:00 +05'30'

**(मनोजकुमार महाले)**
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. स्वीय सहायक, मा. सचिव, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई
४. सार्वजनिक बांधकाम विभाग / नियोजन विभाग / वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
६. उपसचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. संगणक समन्वयक, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

**परिशिष्ट- १**

**आदिम जमातीचे संरक्षण तथा विकास कार्यक्रम सन २०१३-१४**

( रुपये लाखात )

| | | |
|---|---|---|
| १ | योजनेचे नांव - | आदिम जमातीच्या ८ वी ते १० वी च्या मुलींना शैक्षणिक प्रवाहात टिकवून ठेवण्यासाठी प्रोत्साहन देणे |
| २ | योजनेतील युनिट /लाभार्थी संख्या | इयत्ता ८ वर्गात शिकणाऱ्या आदिम जमातीच्या विद्यार्थीनी |
| ३ | योजनेचे प्रस्तावित लाभक्षेत्र | इयत्ता ८ वीत शिकणाऱ्या आदिम जमातीच्या विद्यार्थीनी |
| ४ | **योजनेसाठी येणा-या खर्चाचे अंदाजपत्रक** | **प्रति विद्यार्थीनीसाठी प्रती माह ६००/- रुपये या प्रमाणे १० महीन्यासाठी एकूण ६,०००/- रुपये.एकूण खर्च- रू.२००.०० लक्ष** |
| ५ | योजना राबविणारी यंत्रणा | प्रकल्प अधिकारी |
| ६ | नियंत्रक अधिकारी | अपर आयुक्त / प्रकल्प अधिकारी ए.आ.वि.प्र. |
| ७ | योजनेचा उद्येश / हेतू | आदिम जमातीचा समाज प्रामुख्याने उंचसखल डोंगराळ, अतिदुर्गम भागात वस्ती करुन राहत असून आदिम जमात ही स्थलांतर करणारी जमात आहे. आदिम जमातीचे स्थलांतराचे प्रमाण जास्त असून आई-वडीलांसोबत मुलींचेही स्थलांतर होत असल्याने शिक्षणाच्या मुख्य प्रवाहापासुन मुली वंचित राहातात. प्रामुख्याने इ.८ वी ते १० वी या गटातील विद्यार्थीनीचे शाळा सोडण्याचे प्रमाण विचारात घेवून चालू वर्षात इ.८ वी मध्ये पटावर असणाऱ्या व शिकणाऱ्या विद्यार्थीनीनी सलगपणे इ.१० वी पर्यत शिक्षण घेण्यासाठी प्रतिमाह प्रति विद्यार्थीनी रु.६००/-इतके प्रोत्साहनात्मक अनुदान देण्यात येणार आहे. |
| ८ | लाभार्थी क्षेत्र/ पाडे / वाडया / गावाची निवड | प्रकल्प अधिकारी यांनी आपल्या कार्यक्षेत्रातील इयत्ता ८ वी ते १० वी पर्यंतच्या आदिम जमातीच्या विद्यार्थीनीची निवड करावी. |
| १० | योजना अंमलबजावणीची कार्यपध्दती | १) प्रकल्प अधिकारी कार्यक्षेत्रातील सर्व मान्यताप्राप्त माध्यमिक शाळेतील इयत्ता ८ वी मध्ये शिक्षण घेणाऱ्या आदिम जमातीच्या विद्यार्थीनीची यादी प्राप्त करुन घेतील.<br>२) आदिम जमातीच्या विद्यार्थ्यांची यादी मंजूर लक्षांकापेक्षा जास्त असल्यास आर्थिक निकषाच्या आधारे व गुणवत्तेच्या आधारे लाभार्थ्यांची निवड करण्यात यावी.<br>३) प्रत्येक महिन्याला लाभार्थी विद्यार्थीनीच्या खात्यावर रक्कम जमा करण्यापूर्वी शाळेतून उपस्थिती प्रमाणपत्र प्राप्त करुन घेऊन ९०% उपस्थित विद्यार्थीनींना प्रत्येकी रुपये ६००/- दरमहा या प्रमाणे विद्यार्थ्यीनीच्या / आई- वडीलांच्या संयुक्त खात्यावर रक्कम जमा करण्याची कार्यवाही करावी.<br>४) ज्या विद्यार्थीनींना ८ वी इयत्तेमध्ये या योजनेचा फायदा घेतला आहे त्याच विद्यार्थीनीना इ.९ वी व इ.१० वी इयत्तेत या योजनेखाली सलगपणे फायदा घेता येईल. ज्या प्रकरणी विद्यार्थीनींची उपस्थिती ९० टक्क्याहून कमी असेल अशा |

| | | |
|---|---|---|
| | | प्रकरणी अनुपस्थीत राहण्याची कारणे तपासून त्यानुसार प्रोत्साहन भत्ता देण्याबाबत निर्णय मुख्याध्यापक यांनी घ्यावा.<br>५) ज्या विद्यार्थिनींची उपस्थिती ६५ टक्क्यांहून कमी असेल अशा विद्यार्थीनींना या योजनेचा फायदा देय राहणार नाही.<br>६) निधीचे वाटप-अपर आयुक्त यांच्याकडून प्रकल्प निहाय आदिम जमातीच्या विद्यार्थीनींची आकडेवारी आयुक्त,आदिवासी विकास यांना सादर केल्यानंतर मागणीच्या प्रमाणात प्रकल्प निहाय निधीचे प्रकल्प अधिकारी यांना वाटप करतील. या योजनेची अंमलबजावणी तातडीने करण्याची जबाबदारी सर्व संबंधित प्रकल्प अधिकारी यांची राहील.<br>७)आयुक्त आदिवासी विकास हे जिल्हा निहाय निधी उपलब्धता /वाटप निश्चित करतील. |
| ११ | योजनेचे संनियंत्रण व मुल्यमापन, पर्यवेक्षण | योजनेचे संनियंत्रण व मूल्यमापन करण्याची जबाबदारी शिक्षण विभाग, प्रकल्प कार्यालय व प्रकल्प अधिकारी यांची राहील. |
| १३ | योजनेच्या अटी व शर्ती | १) प्रकल्प अधिकारी यांनी आपल्या कार्यक्षेत्रातील आदिम जमातीच्या इयत्ता ८ वी मध्ये शिकणाऱ्या विद्यार्थ्यीनीची आकडेवारी गोळा करुन निवड करणे आवश्यक आहे.<br>२) सदर योजनेचा खर्च - साध्य अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र अंमलबजावणी यंत्रणेने प्रकल्प अधिकारी यांना व प्रकल्प अधिकारी यांनी अपर आयुक्त कार्यालयास सादर करणे आवश्यक आहे.<br>३) सदर विद्यार्थीनी शिक्षण घेत असलेल्या शाळेस प्रकल्प अधिकारी / सहाय्यक प्रकल्प अधिकारी वा आदिवासी विकास निरीक्षक यांनी वारंवार भेटी देणे आवश्यक आहे.<br>४) सदर योजनेसाठी मंजुर लक्षांकाप्रमाणे पात्र लाभार्थी न मिळाल्यास लक्षांक वर्ग / बदल करण्याचे अधिकार आयुक्त, आदिवासी विकास महाराष्ट्र राज्य, नाशिक यांना राहतील<br>५) योजनेच्या अंमलबजावणीमध्ये क्षेत्रिय कार्यालयास काही अडचणी निर्माण झाल्यास योजना अंमलबजावणीच्या कार्यपध्दतीत बदल करण्याचा अधिकार आयुक्त, आदिवासी विकास महाराष्ट्र राज्य नाशिक यांना राहतील.<br>६) सदर योजनेअंतर्गत लाभ दिलेल्या लाभार्थ्यांच्या याद्या प्रकल्प अधिकरी यांचे कार्यालयातील सूचना फलकावर तसेच आदिवासी विकास विभागाच्या संकेत स्थळावर प्रसिध्द करण्याची जबाबदारी अपर आयुक्त / प्रकल्प अधिकारी यांची राहील.<br>७) योजना मंजूर झाल्यानंतर एक वर्षाच्या आत योजना पूर्ण करणे बंधनकारक राहील. |

## परिशिष्ट- २

## आदिम जमातीचे संरक्षण तथा विकास कार्यक्रम सन २०१३-१४

(रुपये लाखात)

| | | |
|---|---|---|
| १ | योजनेचे नांव - | **आदिम जमातीच्या कुटुंबांसाठी घरकुल योजना.** |
| २ | योजनेतील युनिट /लाभार्थी संख्या | ४०० घरकुले |
| ३ | योजनेचे प्रस्तावित लाभक्षेत्र | आदिम जमातीचे लाभार्थी ( पक्के घरकुल नसलेले ) |
| ४ | **योजनेसाठी येणा-या खर्चाचे अंदाजपत्रक** | **प्रति कुटुंब रुपये १.०० लक्ष या प्रमाणे ४०० कुटुंबांना एकुण रुपये ४००.००लक्ष निधी.** |
| ५ | योजना राबविणारी यंत्रणा | प्रकल्प अधिकारी ए.आ.वि.प्र -जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणेच्या धर्तीवर |
| ६ | नियंत्रक अधिकारी | अपर आयुक्त |
| ७ | योजनेचा उद्येश / हेतू | आदिम जमातीचा समाज प्रामुख्याने गावे / वाडया / पाडे / वस्त्यावंर राहतात. आदिम जमातीच्या हया स्थलांतर करणाऱ्या असुन त्यांना स्वत:ची घरेही नाहीत तर काहींची कुडा-मातीची आहेत अशा आदिम जमातीच्या कुटुंबांना पक्के घरकुल बांधून देवून त्यांना शौचालय व स्नानगृहाची व विद्युत सुविधा उपलब्ध करुन कायम व शाश्वत स्वरुपाचा निवारा उपलब्ध करुन देणे, स्थलांतरास आळा घालून त्यांचे राहणीमानात सुधारणा घडवुन आणणे, कायम व शाश्वत स्वरुपाचा निवारा उपलब्ध करुन देणे व स्थलांतरास आळा घालणे हा या योजनेचा उददेश आहे. |
| ८ | लाभार्थी क्षेत्र/ पाडे / वाडया / गावाची निवड | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प हे जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणेकडील जेष्ठता यादीनुसार पात्र आदिम जमातीच्या लाभार्थ्यांची निवड करुन अपर आयुक्त, आदिवासी विकास यांना यादी मंजुरीसाठी सादर करतील. |
| ९ | योजना अंमलबजावणीची कार्यपध्दती | योजनेची अंमलबजावणी शासन निर्णय दिनांक ३०/७/२००८ व त्यामध्ये झालेल्या सुधारणांप्रमाणे करण्यात येईल. |
| | योजनेसाठी येणा-या खर्चाचे अंदाजपत्रक | प्रति युनिट १.०० लक्ष-<br>कोलाम- १३३ लाभार्थी-रू. १००.०० लक्ष<br>कातकरी - १३३ लाभार्थी- रू.१००.०० लक्ष<br>माडीया -१३४ लाभार्थी- रू.१००.०० लक्ष<br>एकूण - ४०० लाभार्थी - रू.४००.०० लक्ष |
| १० | योजनेचे संनियंत्रण व मूल्यमापन, पर्यवेक्षणन | योजनेचे मुल्यमापन करण्याची अपर आयुक्त यांची राहील. प्रकल्प अधिकारी यांनी किंवा त्यांचे वतीने प्रकल्प कार्यालयातील सहाय्यक प्रकल्प अधिकारी (विकास ), यांनी योजना राबविण्यात आलेल्या क्षेत्रास नियमित कालांतराने स्थानभेट द्याव्यात. |
| ११ | योजनेची मंजुरी अंमलबजावणीचा कालावधी | सन २०१३-१४<br>सन २०१४-१५ |

| | | |
|---|---|---|
| १२ | योजनेच्या अटी व शर्ती | १) घरकुल योजनेसंबंधीच्या आदिवासी विकास विभागाच्या शासन निर्णय दिनांक ३० जुलै २००८ व दिनांक १५ फेब्रुवारी २०१० मध्ये विहीत केलेल्या अटीशर्तीच्या अधिन राहून लाभार्थी व अंमलबजावणी यंत्रणेची निवड करण्यात यावी. तसेच त्यात नमूद टाईप प्लॅन प्रमाणेच घरकुल बांधावे.<br>२) लाभार्थी हा कातकरी, कोलाम, माडीया गोंड या आदिम जमातीचा असावा. त्यांची स्वत:ची किंवा शासनाने दिलेली जागा असावी.<br>३) लाभार्थ्यांस स्वत:चे पक्के घर नसावे तसेच शासनाच्या कोणत्याही विभागामार्फत अथवा जिल्हा परिषदेमार्फत घरकूल योजनेचा लाभ घेतलेला नसावा.<br>४) आवश्यकतेनुसार लाभार्थ्यांशी / संस्थेशी करारनामा करण्यात यावा.<br>५) अपर आयुक्त हे या योजनेचा विशेष आढावा दरमहा घेतील व त्यांचे विभागाचा संकलीत अहवाल आयुक्तालयास सादर करतील.<br>६) उक्त योजनेची अंमलबजावणी करतांना व योजना पूर्ण झाल्यांनंतर चांगल्या प्रतीची चित्रफीत व छायाचित्रे लाभार्थ्यांचे मनोगत यासह फलनिष्पत्ती अहवाल प्रकल्प अधिकारी यांनी त्यांचे स्तरावर जतन करावा तसेच योजनेची यशोगाथा वरिष्ठ कार्यालयास सादर करावी.<br>७) या योजनेअंतर्गत लाभ दिलेल्या लाभार्थ्यांचे नाव, पत्ता, संपर्काचा क्रमांक (असल्यास) जमात, लाभ दिल्याचे वर्ष, लाभाचे स्वरुप, लाभाची किंमत, लाभार्थ्यांचे अर्ज, छायाचित्र इ. माहीती प्रकल्प अधिकारी यांचे स्तरावर जतन करण्यात यावी.<br>८) प्रत्येक घरकूलावर आदिवासी विकास विभागाकडील आदिम जमातींचे संरक्षण तथा विकास कार्यक्रमांतर्गत घरकूल योजना अशा आशयाचे तपशिलवार नामनिर्देशक फलक तयार करुन दर्शनी भागात लावणेत येईल.<br>९) सदर योजनेसाठी मंजूर लक्षांकाप्रमाणे पात्र लाभार्थी न मिळाल्यास लक्षांक वर्ग / बदल करण्याचा अधिकार आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक याना राहील.<br>१०) योजनेच्या अंमलबजावणी मध्ये क्षेत्रीय कार्यालयास काही अडचण निर्माण झाल्यास योजना अंमलबजावणीच्या कार्यपध्दतीत बदल करण्याचा अधिकार आयुक्त, आदिवासी विकास यांना राहील.<br>११) सदर योजने अंतर्गत लाभ दिलेल्या लाभार्थ्यांच्या याद्या अपर आयुक्त, प्रकल्प अधिकारी यांचे कार्यालयातील सूचनाफलकावर तसेच आदिवासी विकास विभागाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्याची जबाबदारी अपर आयुक्त / प्रकल्प अधिकारी यांची राहील. |